एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत, राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यास राज्य स्तरीय कार्यकारी समितीमध्ये बदल करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआयडीएच/२०१४/प्र.क्र.८२- भाग-१/९-अे**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २४ मार्च, २०१७**

वाचा-

१) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.एमआयडीएच-२०१४/प्र.क्र.८२-भाग-१/९-अे, दि.३०.५.२०१४

प्रस्तावना-

केंद्र शासनाने दिनांक १ एप्रिल २०१४ पासून कॅबिनेट कमिटी ऑन इकॉनोमिक्स अफेर्स च्या शिफारशीनुसार संपूर्ण देशात राष्ट्रीय फलोत्पादन अभियान, (NHM) पूर्व उत्तर आणि हिमालियन राज्यासाठी फळबाग अभियान (HMNEH), राष्ट्रीय बागवनी मंडळ, (NHB) नारळ विकास मंडळ (CDB), व केंद्रीय फलोत्पादन संस्था (CIH) या सर्व योजनांचे एकत्रिकरण करुन एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (Mission for Integrated development of Horticulture) राबविण्याचा निर्णय घेतला आहे.

त्यानुसार राज्यात राबविला जाणा-या राष्ट्रीय फलोत्पादन अभियान चा समावेश एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान झालेला आहे. ही योजना आता एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान अशी राबविली जाईल. सदर योजना राज्यात सन २०१४-१५ पासून राबविण्यास शासन निर्णय क्रमांक एमआयडीएच-२०१४/प्र.क्र.८२/९-अे, दिनांक ३०.५.२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४.१ मध्ये राज्यस्तरीय कार्यकारी समिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय**-

शासन निर्णय क्रमांक एमआयडीएच-२०१४/प्र.क्र.८२/९-अे, दिनांक ३०.५.२०१४ च्या परिच्छेद ४.१ मधील राज्यस्तरीय कार्यकारी समिती ऐवजी खालीलप्रमाणे राज्यस्तरीय कार्यकारी समिती कार्यरत राहील.

| अ.क्र. | पदनाम | राज्यस्तरीय समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (कृषि), मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | मिशन डायरेक्टर,एमआयडीएच, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ६ | उपसचिव/सहसचिव,फलोत्पादन,मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७ | संचालक, राष्ट्रीय डाळींब संशोधन केंद्र, सोलापूर | सदस्य |
| ८ | संचालक,राष्ट्रीय द्राक्ष संशोधन केंद्र, मांजरी, पुणे | सदस्य |
| ९ | संचालक, राष्ट्रीय संत्रा संशोधन केंद्र, नागपूर | सदस्य |
| १० | संचालक, राष्ट्रीय कांदा लसूण संशोधन केंद्र, राजगुरुनगर, पुणे | सदस्य |
| ११ | विभागप्रमुख, फलोत्पादन, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी | सदस्य |
| १२ | विभागप्रमुख, फलोत्पादन,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली | सदस्य |
| १३ | विभागप्रमुख,फलोत्पादन,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | सदस्य |
| १४ | विभागप्रमुख,फलोत्पादन, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला | सदस्य |
| १५* | फळे, भाजीपाला व फुले उत्पादन संघाचे प्रतिनिधी/शेतकरी उत्पादक संस्थेचे प्रतिनिधी (FPO) प्रत्येकी एक | सदस्य |
| १६ | संचालक, फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| १७ | प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १८ | संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे | सदस्य |
| १९ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे | सदस्य सचिव |

* फळे, भाजीपाला व फुले उत्पादन संघाचे व शेतकरी उत्पादक संस्थेच्या प्रतिनिधींचे नियुक्तीचे अधिकार अध्यक्ष व सदस्य सचिव यांना राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१५२५४५३४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.03.30 15:29:03 +05'30'

**(क.य.वंजारे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे प्रधान सचिव.
२. मा. मंत्री (कृषि) महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम, मंत्रालय, मुंबई.
८. सहसचिव व अभियान संचालक,कृषि मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
९. कुलगुरु, राज्यातील सर्व कृषि विद्यापीठे.
१०. संचालक, भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली.
११. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१२. उपसचिव, फलोत्पादन, मंत्रालय, मुंबई.
१३. व्यवस्थापकीय संचालक, नाबार्ड, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन मंडळ, पुणे.
१५. प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर.
१६. संचालक, राष्ट्रीय डाळींब संशोधन केंद्र, सोलापूर.
१७. संचालक,राष्ट्रीय द्राक्ष संशोधन केंद्र, मांजरी, पुणे.
१८. संचालक, राष्ट्रीय संत्रा संशोधन केंद्र, नागपूर.
१९. संचालक, राष्ट्रीय कांदा लसूण संशोधन केंद्र, राजगुरुनगर, पुणे.
२०.संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२१. विभागप्रमुख, फलोत्पादन, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी.
२२. विभागप्रमुख, फलोत्पादन,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली

२३. विभागप्रमुख,फलोत्पादन,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
२४. विभागप्रमुख,फलोत्पादन, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
२५. राज्यातील सर्व जिल्हाधिकारी.
२६. राज्यातील सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२७. राज्यातील फळे, भाजीपाला व फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी.
२८. शेतकरी उत्पादक संस्थेचे प्रतिनिधी.
२९. राज्यातील सर्व विभागीय कृषि सह संचालक.
३०. राज्यातील सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
३१. प्रकल्प संचालक, सर्व जिल्हा ग्रामविकास यंत्रणा.
३२. सर्व कार्यासने (कृषि व पदुम विभाग), मंत्रालय, मुंबई.
३३. निवड नस्ती.